अल्पसंख्याक समाजातील मुलींसाठी
वसतीगृह बांधण्यासाठी निधी उपलब्ध
करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
अल्पसंख्यांक विकास विभाग,
**शासन निर्णय** क्रमांकः अविवि-२००९/प्र.क्र.१५/का.८,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांकः ३० मार्च, २०१०.

वाचा : शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र. मौआम-२००९/प्र.क्र.१५/का.८,
दिनांकः ०२.०३.२०१०.

**प्रस्तावना :-**

राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनींसाठी वसतीगृहे बांधण्यात येणार असून केंद्र शासनाने राज्यातील ज्या २५ जिल्हयांमधील ४३ शहरे "अल्पसंख्याक बहुल क्षेत्रे" म्हणून घोषित केली आहेत, अशा २५ जिल्हयांमध्ये प्राथम्याने वसतीगृह उभारणी करावयाची आहे. याबाबतचा शासन निर्णय समक्रमांक, दिनांक २ मार्च, २०१० रोजी निर्गमित करण्यात आला आहे. औरंगाबाद, चंद्रपूर, नंदूरबार, अमरावती व परभणी या जिल्हयात अल्पसंख्याक समाजातील मुलींच्या वसतीगृहाच्या बांधकामासाठी प्रति वसतीगृह येणा-या रू.२,०७,०१,२७९/- इतक्या खर्चाच्या ढोबळ अंदाजपत्रकास शासन निर्णय समक्रमांक, दिनांक २७ मार्च, २०१० अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर ५ जिल्हयांमध्ये वसतीगृहाच्या बांधकामासाठी निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

औरंगाबाद, चंद्रपूर, नंदूरबार, अमरावती व परभणी या ५ जिल्हयात अल्पसंख्याक समाजातील मुलींसाठी वसतीगृहाच्या बांधकामासाठी अनुक्रमे जिल्हाधिकारी औरंगाबाद, चंद्रपूर, नंदूरबार, अमरावती व परभणी यांना प्रत्येकी रू. १,००,००,०००/- (रूपये एक कोटी फक्त) याप्रमाणे एकूण रू. ५,००,००,०००/- (रू. पाच कोटी फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम जिल्हाधिकारी औरंगाबाद, चंद्रपूर, नंदूरबार, अमरावती व परभणी यांचेकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरीता संबधित जिल्हाधिकारी आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. जिल्हाधिकारी औरंगाबाद, चंद्रपूर, नंदूरबार, अमरावती व परभणी यांना सन २००९-१० करीता मंजूर करण्यात आलेली प्रत्येकी रू. १,००,००,०००/- (रूपये एक कोटी फक्त) याप्रमाणे एकूण रू. ५,००,००,०००/- (रू. पाच कोटी फक्त) इतकी रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

४. सदर निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र संबधित जिल्हाधिकारी यांनी शासनास सादर करावे.

५. यावर होणारा खर्च मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यक्रम,(०१) (०८) अल्पसख्याक समाजातील मुलींच्या वसतीगृहांसाठी सहाय्यक अनुदान, (२२३५ ए १४२) ३१- सहाय्यक अनुदान या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २००९-२०१० या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय, नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३४८/१४७५ दिनांक २८/३/२०१० व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक २३६/व्यय-४, दिनांक ३०.३.२०१० व ५००/अर्थ-१४, दि. ३०.०३.२०१० अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(उ. सं. दांडेकर)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
महालेखापाल, महाराष्ट्र-१,(लेखा व अनुज्ञेयता)मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-१,(लेखा परीक्षा) मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२,(लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र-२,(लेखा परीक्षा) नागपूर
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मुंबई
जिल्हाधिकारी, औरंगाबाद/ चंद्रपूर/ नंदूरबार/ अमरावती व परभणी
प्रमुख लिपिक, जिल्हाधिकारी कार्यालय, औरंगाबाद/ चंद्रपूर/ नंदूरबार/ अमरावती व परभणी
अवर सचिव (रोख शाखा), अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (रोख शाखेमार्फत)
जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/ चंद्रपूर/ नंदूरबार/ अमरावती व परभणी
वित्त विभाग,(अर्थसंकल्प-१४, व्यय-४ ) मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग, (कार्या.१४७५).
रोख शाखा व का.७, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, का.-८